**आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई येथे दाखल गु.र.क्र. ९८/२०१७ मधून उद्भवलेल्या सर्व प्रकरणाचे न्यायालयीन कामकाज पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. प्रदिप घरत यांना व्यावसायिक फी प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:- एसपीपी-१०१९/प्र.क्र. २३३/पोल-१०,**
गृह विभाग, २ रा मजला,मुख्य इमारत, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १९ ऑक्टोबर, २०२०

संदर्भ :-१) शासन पत्र, विधि व न्याय विभाग क्र. ८४/क्रिमी.जन/२०१९/अे शाखा, दि. ३०.०८.२०१९,
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि.२९.०७.२०१५
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि.१६.०६.२०१७

**प्रस्तावना :-**

आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई यांचेकडील गु.र.क्र.९८/२०१७ गुन्हयातील तक्रारदार यांनी आरोपी कंपनी विरुध्द मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेली रिट याचिका तसेच, नॅशनल कंपनी लॉ ट्रिब्युनल, मुंबई येथे आरोपी कंपनी विरुध्द ५ दावे केले आहेत. (Insolvency application No.4578/2018, CP(B)-514/MB/2018, CP(IB)-3060/MB/2018, CP(IB)-472/MB/2018, CP(IB)-2975/MB/2018) उक्त प्रकरणाच्या सुनावणीच्यावेळी मा. उच्च न्यायालय, मुंबई व नॅशनल लॉ ट्रिब्युनल, मुंबई येथे शासनाच्या वतीने प्रभावीपणे युक्तीवाद करणेसाठी ॲड श्री. प्रदीप घरत यांची विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून गुन्ह्यातून उद्भवलेल्या न्याय प्रकरणाच्या मा. उच्च न्यायालय, मुंबई सुनावणीच्यावेळी शासनाच्यावतीने प्रभावीपणे युक्तीवाद करणेसाठी ॲड श्री. प्रदीप घरत यांची विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून विधि व न्याय विभागाने मान्यता दिलेली आहे.

मा. उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयातील उक्त न्याय प्रकरणी न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड श्री. प्रदिप घरत यांना व्यावसायिक फी अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई येथे दाखल गु.र.क्र. ९८/२०१७ मधून उद्भवलेल्या न्याय प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई व नॅशनल लॉ ट्रिब्युनल, मुंबई या न्यायालयातील न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड श्री. प्रदिप घरत यांना प्रतिदिन परिणामकारक सुनावणीकरीता खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर व्यावसायिक फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड श्री. प्रदिप घरत यांना अनुज्ञेय होणार नाहीत.

मा. उच्च न्यायालय, मुंबई व नॅशनल लॉ ट्रिब्युनल, मुंबई या न्यायालयातील न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी व्यावसायिक फी पुढीलप्रमाणे असेल.

१) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - २०,०००/- (रु. वीस हजार फक्त)
२) विचारविनीमय फी (प्रति बैठक) - २,०००/- (रु. दोन हजार फक्त)

२. ॲड. श्री. प्रदिप घरत यांना अनुज्ञेय असलेल्या व्यावसायिक फीचे प्रदान दर दोन महिन्याच्या न्यायालयीन कामकाजानंतर करण्यात यावे. न्यायालयीन कामकाजाचे परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान ॲड श्री. प्रदिप घरत यांना होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलिस उपायुक्तांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्रमांक बी - १, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२)(०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय दि. १६.०६.२०१७ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र २०२०१०२०१६२०५७१९२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.10.20 16:22:22 +05'30'

**(किशोर भालेराव)**
**उप सचिव (विधि), गृह विभाग**

**प्रत,**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२. सह पोलीस आयुक्त, आर्थिक गुन्हे विभाग, पोलीस आयुक्त कार्यालय आवार, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई-१,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. ॲड श्री. प्रदिप घरत,६/६०३, क्षितीज को-ऑप हौ.सो.लि., माहिम कापड बझार रोड, स्टेप इन हॉटेल जवळ, माहिम, मुंबई- ४०००१६.
७. विधि व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती- पोल-१०.